तिरू नदीवरील डोंगरगाव - २ ता. जळकोट, जि. लातूर को.प.बंधा-याचे बॅरेजमध्ये रूपांतरण विस्तार व सुधारणांतर्गत अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.३८२/२०२१)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ०८ मार्च २०२२

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम-/सिंचन-२/विवसु -BIPC/ धा-१६ / १०६१३ दि. २०/१२/२०२१.
२. शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/(५५१/१७)/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१६/९/२०२१.

प्रस्तावना:-

लातूर जिल्हयातील तिरू नदीवर डोंगरगाव क्रमांक २ कोल्हापूरी पध्दतीचा बंधारा १९९१-९२ मध्ये बांधण्यात आलेला आहे. प्रकल्पाची साठवण क्षमता ०.२४८ दलघमी व सिंचन क्षमता ६१ हेक्टर एवढी आहे. सदर को.प. बंधा-याची एकूण लांबी ७०.५० मी. आहे. को.प. बंधारा मोडकळीस आल्यामुळे यामध्ये प्रकल्पीय पाणीसाठा व सिंचन होत नाही. तिरू नदीवरील डोंगरगाव क्र. २ ता. जळकोट, जि. लातूर को.प.बंधा-याचे बॅरेजमध्ये रूपांतरण विस्तार व सुधारणांतर्गत अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:-

१. गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत तिरू नदीवरील डोंगरगाव क्र. २ ता. जळकोट, जि. लातूर को.प.बंधा-याचे बॅरेजमध्ये रूपांतरण विस्तार व सुधारणांतर्गत अंदाजपत्रकास या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या रू. **१९,०८,८३,०१५ /-** (रू. एकोणवीस कोटी आठ लक्ष त्रयाऐंशी हजार पंधरा फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून (बांधकाम साहित्य Cement , Steel etc च्या दरवाढीमुळे, भाववाढीमुळे व GST , Royalty मुळे होणारी किंमत वाढ अनुज्ञेय राहिल.) सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि. १.१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे.

३. शासन पत्र दि. ४/६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे एक वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

५. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे प्रस्तावात दर्शविलेले असून यात तांत्रिक मान्यता प्रदान करताना त्यात बदल करण्यात येऊ नये .

६. प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम / तोडफोड याद्वारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

७. कामाचा खर्च सर्वसाधारणपणे उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा. तथापि बांधकाम साहित्य ( Cement , Steel etc ) च्या दरवाढीमुळे, भाववाढीमुळे व GST , Royalty मुळे होणारी किंमत वाढ अनुज्ञेय राहिल.

८. विषयांकित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर ,संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

९. सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१०. सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जाबबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

११. सदर कामाची निविदा प्रक्रिया सुरू करण्यापुर्वी कामाची सविस्तर संकल्पने व रेखाचित्रे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना , नाशिक यांचेकडून अंतिम करून प्रमाणित करून घेण्यात यावीत.तसेच प्रस्तावित काम अस्तित्वातील को.प.बंधा-याच्या U/s किंवा D/s ला घेण्याबाबत योग्य पर्यायाचा क्षेत्रिय पातळीवर विचार करण्यात यावा.

१२. सदर काम हाती घेणेपूर्वी अस्तित्वातील को.प.बंधारा जिल्हापरिषद , लातूर यांचेकडून हस्तांतरीत करून घेतल्याची मुख्य अभियंता यांनी खात्री करून घ्यावी व त्यानंतरच निविदा विषयक कार्यवाही करावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण , १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अनुदान (००)(०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (मराठवाडा विभाग)(कार्यक्रम) (४७०२ ४९९२) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २८ / २०२२ दि. १५/२/२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७३ /२०२२ दि. १८/ २ /२०२२ नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ४६ सन २०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८१२०९३७५०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.08 16:07:25 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१४) मुख्य अभियंता (जसं),जलसंपदा विभाग ,औरंगाबाद
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता , बीड पाटबंधारे मंडळ,परळी वैजनाथ,
१७) कार्यकारी अभियंता, निम्न तेरणा कालवा विभाग क्र. २ ,लातूर
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.३८२/२०२१)/ सिंव्य (कामे),

दि. ०८/ ०३ / २०२२ चे सहपत्र

| अ.क्र. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 160268547 |
| 2 | B - Land | 3214013 |
| 3 | Royalty | 1757417 |
| 4 | १ % Insurance | 1602685 |
| 5 | १२ % GST | 19232226 |
| 6 | ३ % Contingencies | 4808056 |
| | **Total Rs.** | 190883015 |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.08 16:07:41 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )

शासनाचे उप सचिव